


# CHRONOLOGICAL TABLES

CONTAINING

## THE ORIGINAL PREFACE

OF

The Late Professor

## BALAJI PRABHAKAR MODAK

AND

## CORRESPONDING DATES

OF

The Hindu, Mahomedan & Christian Eras

*From A. D. 1929 to 1940.*

---

Compiled by

Vishwanath Balvant Modak,

Shastriya Dnyan Bhandar,

KOLHAPUR.

............

Printed by M. N. Dixit, Manager, Shri Venkateshwar Press, Branch Kolhapur & published by Vishwanath Balvant Modak, Kolhapur.

---



---

1930.

---

Price Re one.

---

# ग्रंथकर्त्यांची प्रस्तावना.

कोल्हापूरराज्याचा इतिहास लिहिण्याकरितां करवीर सरकारच्या पारसनवीस दप्तरांतील जुने कागदपत्र पाहत असतां, निरनिराळ्या कागदांचा मेळ घालतांना, ऐतिहासिक गोष्टींचा काळ ठामपणें ठरवितांना व कागदांतील मराठी मिति व मुसलमानी चंद्र यांस इंग्रजी तारखा देतांना फार अडचणी येऊं लागल्या. कारण कोठें शालिवाहन शक, मराठी महिना व तिथि असावी; कोठें राजशक देऊन संवत्सर, मराठी महिना व तिथि अशीं दिलेलीं असावी, आणि कोठें मुसलमानी चंद्र व महिना देऊन कोठें सुरुसन व कोठें फसली सन असें दिलेलें असावें. निजामाकडील व हैदराकडील आलेल्या पत्रांत मुसलमानी महिना व चंद्र असून हिजरी सन असावा, इंग्रजांकडील पत्रांत इंग्रजी सन, महिना व तारीख असून शिवाय मुसलमानी सन व तारीख असें असावें. याप्रमाणें भिन्न भिन्न शक व सन पहाण्यांत येऊं लागले, तेव्हां या सर्वांची एकवाक्यता करून हरएक गोष्टींचा काळ एक पद्धतीनें देण्यास फार मुष्कील पडूं लागली, व गोंधळ होऊं लागला. यांतून पार पडण्यासाठीं मराठी मितीवरून मुसलमानी व इंग्रजी तारखा काढण्याचा व तसेंच अमुक तिथि किंवा तारीख अमक्या वारीं पडली होती हें काढण्याच्या वगैरे रीति जमविल्या व त्याचप्रमाणें उपलब्ध असलेल्या जंत्र्याही मिळविल्या. परंतु त्या बहुतेक केवळ सालवार असल्यामुळें मिति व तारखा यांचा मेळ घालण्यास त्यांचा कांहींएक उपयोग होईना, आणि प्रत्येक कागदपत्र पाहते वेळीं वरील रीतींनीं हिशेब करण्याची कटकट वाटूं लागली.

याप्रमाणें फिकिरींत असतां करवीरचे दप्तरदार रावसाहेब गोविंद बापूजी देवल यांनीं चिटणीस दप्तरीं वार, मिति व तारखा असलेली अशी एक जंत्री असल्याचें सांगितलें. ती पहातांच मला जी माहिती पाहिजे होती ती माहिती तिजमध्यें आयतीच आहे, व मला ज्या काळापासून पाहिजे त्या काळापासूनच आहे असें दिसलें. ही जंत्री कोणी अंताजी जनार्दन * नामजोशी यांनीं जुनीं पंचांग जमवून करवीर सरकारच्या उपयोगाकरितां तयार केली असावी असें दिसतें. कारण करवीर सरकारचें राज्य वेगळें व स्वतंत्र झाल्यापासून ह्मणजे शके १६५० किंवा सन १७२८ सालापासून हिचा आरंभ आहे. ही जंत्री कोल्हापुरी कागदाच्या उभ्या बंदावर मोडींत लिहिलेली असून तिचे पाटपोट ६३१ बंद आहेत. तिजमध्यें आरंभीं वार दिलेले असून पुढें तीन कोष्टकें आहेत. एका कोष्टकांत मराठी महिने व तिथी दिल्या आहेत व त्यांतच शालिवाहन शक, विक्रम संवत्, आणि राजशक ज्या ज्या वेळीं बदलले तेथें तेथें दिले आहेत. दुसऱ्या कोष्टकांत मुसलमानी महिने व तारखा दिलेल्या असून हिजरी, फसली व सुरुसन आहेत व तिसऱ्यांत इंग्रजी सन, महिने, व तारखा दिलेल्या आहेत. ही जंत्री शके १६५० किंवा सन १७२८ पासून शके १७७७ किंवा सन १८५५ पर्यंत आहे. यावरून ही या सालीं समाप्त केली असावी.

---

* हे गृहस्थ रावबहादुर दाजी पंडित यांच्या कारकीर्दींत कोल्हापूर येथें कारकून होते असें समजतें.

या जंत्रींतील तिथि, तारीख, वार वगैरे सर्व माहिती येण्याजोगी हल्लीं प्रसिद्ध केलेल्या नमुन्यावर संक्षिप्त रचना करून तिची नक्कल घेतली. आणि शके १७७७ सालापुढील पंचांगें मिळवून चालू सालापर्यंत नक्कल तयार केली. आणि या जंत्रीवरून मिति व तारखा यांचा मेळ घालून व इंग्रजी तारखा देऊन कोल्हापूरराज्याच्या इतिहासाचा पहिला भाग छापून प्रसिद्ध केला. याच वेळीं रा० रा० विष्णु बाबाजी भेडसगांवकर यांनीं एक जंत्री दिली. ही जंत्रीही शके १६५० पासूनच असून प्रत्येक सालचे महिने देऊन प्रत्येक महिन्यांतील क्षय व वृद्धि या तिथि दिलेल्या होत्या. हिचा वरील जंत्री शुद्ध करण्यास उपयोग झाला. मी तयार केलेली संक्षिप्त नक्कल छापल्यास सर्वांस उपयोगीं पडेल असें वाटलें; परंतु कागदपत्र पहातांना असें आढळलें होतें कीं, मराठी तिथि व वार आणि इंग्रजी व मुसलमानी तारखा व वार यांचा मेळ पडण्यास सन १७५२ पासून १८०० पर्यंत एक दिवसाची व त्या मागें याहून जास्त तफावत पडते. भेडसगांवकरांच्या जंत्रींतही हीच चूक आढळूं लागली.

जंत्री छापणें तर चांगली शुद्ध करून छापिली पाहिजे. तेव्हां रा० रा० नारायण बाळकृष्ण गोडबोले यांनीं एक छोटी जंत्री सन १८०१ पासून पुढील सालची छापली आहे. ती मिळवून तिशीं माझी नक्कल ताडून पाहतां सन १८०१ पासून पुढील सर्व तिथि, तारखा व वार बरोबर मिळाले. तेव्हां या मागें कोठें तरी चूक आहे अशी खात्री झाली. मागें पहातां पहातां असें आढळलें कीं, ग्रेगोरिअन पद्धतीप्रमाणें १८०० साल लीप वर्ष नाहीं; परंतु तें लीप वर्ष समजून फेब्रुआरीचे २९ दिवस धरून मागें तारखा मांडिलेल्या आहेत; तसेंच सन १७५२ सालीं इंग्लंडच्या पार्लमेंट सभेंत आक्ट पसार होऊन तारीख ३ सप्टेंबरास १४ सप्टेंबर ह्मणावयाचें ठरलें व नवी किंवा ग्रेगोरिअन पद्धत सुरू झाली; परंतु या जंत्रींत तसें न करितां सरसकट ग्रेगोरिअन पद्धतीप्रमाणें १ दिवसाच्या चुकीनें थेट सन १७२८ पर्यंत इंग्रजी तारखा मांडिलेल्या आहेत असें समजलें. या चुकीमुळें सन १८०० पर्यंत इंग्रजी तारखा ग्रेगोरिअन किंवा नव्या पद्धतीप्रमाणेंही नाहींत, आणि जुन्या किंवा जूलिअन पद्धतीप्रमाणेंही नाहींत. या चुकीमुळें इंग्रजी तारखा सन १७५२ सप्टेंबरपर्यंत १२ दिवसांनीं व त्या पुढील सन १८०० पर्यंत एक दिवसानें चुकलेल्या आहेत, अशी खात्री झाली. इतक्यांत रा० रा० रामचंद्र नारायण पाध्ये यांनीं **पंचांगसार** या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें; त्यांतही शके १६५० पासूनच माहिती असून जरी क्रमानें तारीख वार नाहीं, तरी बरीच गरज भागण्याजोगी माहिती आहे, व ही पाहिल्यावर मी तयार केलेली नक्कल छापूं नये असें वाटलें.

यांत १७५२ सालीं सप्टेंबरांत एक दिवस चढवून पुढील तारखा दुरुस्त केल्या आहेत. परंतु त्या पूर्वीच्या तारखा थेट नामजोशी यांच्या जंत्रींतल्या प्रमाणें केलेल्या आहेत. ह्मणजे धड जुलिअन पद्धतीप्रमाणें नाहींत, व धड ग्रेगोरिअन पद्धतीप्रमाणेंही नाहींत. यास्तव आपली जंत्री शुद्ध करून छापावी ह्मणजे लोकांस उपयोगी पडेल असें वाटलें. नंतर मुंबईच्या सदर अदालतीच्या उपयोगाकरितां कित्येक ज्योतिषी नेमून इसवी सन १७५० पासून इसवी सन १८०० पर्यंत एक जंत्री तयार करवून मुंबई सरकारनें प्रसिद्ध केली आहे. ती **अकौंटंट जनरलची क्रनालाजिकल टेबल्स** या नांवानें प्रसिद्ध असून चांगली शुद्ध आहे असें समजलें.

परंतु तिची प्रत बरेच दिवस मिळेना. शेवटीं रा० रा० नारायण बाळकृष्ण गोडबोले यांनीं तिची प्रत पैदा करून दिल्याबर तिजवरून माझी नक्कल शुद्ध केली.

इसवी सन १७२८ सालीं इकडे इंग्रजी राज्य नव्हतें, व सन १८१८ सालीं पेशवाई बुडून इंग्रजी अम्मल होईपर्यंत इकडील मराठी पंचांगांत इंग्रजी तारखा घालण्याची वहिवाट नव्हती. तेव्हां नामजोशी यास जीं जुनीं पंचांगें मिळालीं असतील त्यांत मराठी तिथि, वार आणि मुसलमानी सुरूसन, फललीसन व हिजरीसन आणि तारखा असाव्या. यावरून मराठी तिथि व मुसलमानी तारखा ओळीनें उतरून घेऊन सन १८१८ सालच्या पुढील ज्या पंचांगांत इंग्रजी तारखा मिळाल्या तेथपासून मागें सरसकट घालीत गेले. आणि ज्या सनास ४ नीं भाग तुटतो ते सर्व सन लीपवर्ष समजून त्या वर्षांत फेब्रुवारीचे २९ दिवस धरीत गेले. यामुळें सन १८०० हें लीपवर्ष नसतां या सालांतील फेब्रुवारीचे दिवसही २९ धरून तारखा मांडीत गेल्यामुळें ग्रेगारिअन पद्धतीप्रमाणेंही या तारखा एक दिवसानें चुकलेल्या होत्या; सन १८०० सालीं फेब्रुवारीचे २८ दिवस धरून सर्व तारखा एकेक दिवसानें मागें घेऊन सन १७५२ सालच्या १४ सप्टेंबरपर्यंत दुरुस्त केल्या. सन १७५२ सालीं ३ सप्टेंबरास १४ सप्टेंबर ह्मणण्याचे ठरलें होतें ह्मणून त्यामागें २ सप्टेंबरास आरंभ करून मागील तारखाही अकौंटंट जनरलच्या जंत्रीवरून दुरुस्त केल्या. तसेंच मराठी तिथि, अधिक महिने व क्षयमास एकंदर चार जंत्र्यांवरून तपासून पाहिले आणि ही शुद्ध प्रत छापून प्रसिद्ध केली आहे. आतां प्रस्तुत जंत्रीचा रचना थोडक्यांत सांगतों.

जंत्रीस शके १६५० पासून आरंभ केला आहे. पहिल्या कोष्टकांत वार देऊन त्यापुढें शालिवाहन शक व संवत्सर, विक्रमसंवत् आणि राजशक देऊन या तिहींत साधारण मराठी महिने व तिथी दिल्या आहेत. यापुढें सुरूसन अक्षरी व अंकी आणि फसली व हिजरी सन देऊन यांस साधारण मुसलमानी महिने व तारखा दिल्या आहेत. व त्यापुढें इसवीसन व इंग्रजी महिने व तारखा दिल्या आहेत. तिथी व तारखांची पांच पांच कोष्टकें आहेत; पहिल्या चोहोंत सात सात तिथि व तारखा असून शेवटल्यांत एक किंवा दोन आल्या आहेत. पहिल्या तिथि शुद्धपक्षाच्या व पुढल्या वद्यपक्षाच्या समजावयाच्या. त्याचप्रमाणें मुसलमानी व इंग्रजी तारखांतील पहिल्या तारखा त्यांवरील पहिल्या महिन्याच्या व पुढल्या पुढील दुसऱ्या महिन्याच्या समजावयाच्या. प्रत्येक महिन्यास सर्व सालें लिहिलीं आहेत. यास्तव मागेंपुढें पाहण्याची जरूरी नाहीं. अमक्या तिथीस किंवा तारखेस अमकीच तारीख किंवा तिथि व वार होता हे पहाणें झाल्यास ती तिथी किंवा तारीख कोष्टकात पाहून त्याच ओळींत त्याच नंबरच्या कोष्टकांत पाहिले ह्मणजे एकदम सांपडेल.

मराठी महिन्याच्या पहिल्या कोष्टकांतील तिथींच्या दिवशीं असलेल्या मुसलमानी व इंग्रजी तारखा तेथील पहिल्या कोष्टकांत दुसऱ्या कोष्टकांतील तिथींच्या दिवशींच्या तारखा दुसऱ्या कोष्टकांत या क्रमानें ओळीनें दिलेल्या आहेत. जंत्रीतील कोणताही महिना उघडला असतां त्या संबंधाची सर्व माहिती आयतीच एके जागीं सांपडेल. विक्रमसंवत्, राजशक, सुरुसन्, फसली, हिजरी व इसवी सन ज्या ज्या मितीस व तारखेस बदलले हे पटकन समज-

ण्याकरितां सर्व ठिकाणीं खुणा केल्या आहेत. याप्रमाणें पहातांच सर्व माहिती एकदम मिळावी अशी रचना केली आहे. यामुळें हें पुस्तक या माहिती पुरतें केवळ आरशाप्रमाणें आहे असें ह्मटलें तरी चालेल. आतां यांत जे शक व सन दिले आहेत त्यांविषयीं थोडथोडी माहिती देऊन प्रस्तावना पुरी करितों.

शालिवाहन शक—शालिवाहन या नांवाचा राजा दक्षणेंत होऊन गेला. तेव्हांपासून या शकाची प्रवृत्ति झाली. हिंदु वर्ष चांद्रसौरमानाचें असून साधारण वर्षास संवत्सर असें ह्मणतात व प्रत्येक वर्षाचे १२ चांद्रमास असतात. दर तिसऱ्या वर्षी एक अधिक मास धरितात. चंद्रसूर्यांच्या बरोबर युतिकाळीं या वर्षास आरंभ होतो व हा युतिकाळ बहुतेक चैत्रशुद्ध प्रतिपदेस होतो, व याच दिवशीं वर्षास आरंभ होतो. शुक्लप्रतिपदेपासून आमवास्येपर्यंत एक चांद्रमास होतो, आणि सूर्य पूर्वराशीचा त्याग करून पुढील राशीस गेला ह्मणजे सूर्याचा एक राशिभोग झाला ह्मणजे एक सौरमास होतो.

महिने मोजण्याच्या दोन रीति आहेत. (१) दक्षिण हिंदुस्थानांत दर महिन्यास अमावास्येनंतर आरंभ होतो; आणि महिन्याच्या ३० दिवसांचे २ विभाग केलेले असतात. शुद्धप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत पहिल्या १५ दिवसांस शुक्लपक्ष ह्मणतात, आणि वद्य प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत पुढच्या पंधरवड्यास कृष्ण, बहुल किंवा वद्यपक्ष असें ह्मणतात. आणि (२) उत्तरहिंदुस्थानांत व तेलंगण प्रांतांत सूर्यसिद्धांतांत सांगितलेलें बृहस्पतिमान धरितात; आणि यामुळें त्यांचा महिना पौर्णिमा झाल्यावर वद्य प्रतिपदेपासून सुरू होतो.

त्या सौरमासांत सूर्य आणि चंद्र यांची युति घडते त्यावरून चांद्रमासास नांव दिलेलें असतें. ज्या वर्षी एका सौरमासांत दोन पौर्णिमा येतात, त्या वर्षाचे १३ महिने असतात, आणि बहुधा ३२ महिने २६ दिवसांनीं अधिकमास येतो. तेराव्या महिन्यास त्याच चांद्रमासाचें नांव देतात. त्याच नांवाचा जो नवा महिना असेल त्यास अधिक मास असें ह्मणतात, आणि या वर्षास अधिक संवत्सर असें ह्मणतात.

१६० वर्षांत एक किंवा दोन वेळा असें घडतें कीं शेवटल्या ६ चांद्रमासांपैकीं कोणत्या तरी एका मासांत पौर्णिमा मुळींच येत नाहीं असें होतें; तेव्हां ज्या महिन्यांत पौर्णिमा पडत नाहीं, त्या महिन्यास अजीं गाळून त्याचा क्षय करितात, आणि त्याच वर्षी दुसरी एक महिना अधिकमास धरितात अशा वर्षास क्षय संवत्सर असें ह्मणतात. साधारणपणें ज्या महिन्यांत संक्रांत नाहीं तो अधिकमास समजतात, आणि ज्या महिन्यांत दोन संक्रांती येतात त्यास क्षयमास समजतात.

क्षयमास बहुतकरून कार्तिक, मार्गशीर्ष आणि पौष या तिहींपैकीं असतो. पूर्वी ज्या शतकांत क्षयमास आला असेल त्या शकापासून १४१ वर्षांनीं पुनः क्षयमास येतो आणि पुढें एखादे समयीं १९ वर्षांनीं क्षयमास येतो. पूर्वी शके १६०३ सालीं क्षयमास आला होता. त्यानंतर आमच्या जन्मांतच शके १७४४ सालीं आला, व पुढें १९ वर्षांनीं ह्मणजे शके १७६३

साली आला आहे. हें केवळ स्थूलमान असून याविषयीं मतभेद आहे. शके १८८५, १९०४ आणि १९५० या सालीं क्षयमास येतील असा निर्णय कैलासवासी केरोपंत नाना छत्रे यांनीं केलेला आढळतो.

प्रत्येक चांद्रमासाच्या ३० तिथि असतात शुक्लपक्षाच्या १५ व कृष्णपक्षाच्या १५ यांत क्षयवृद्धि होते. जेव्हां दोन तिथि एकाच सौरमानाच्या दिवशीं समाप्त होतात तेव्हां मधल्या तिथीचा क्षय करितात. सौरमानाच्या दिवशीं ज्या तिथीचा आरंभ किंवा समाप्ति होत नाहीं ती तिथि दोन वेळ घालून पहिलीस अधिक किंवा वृद्धि तिथि असें नांव देतात. सूर्योदयीं किंवा त्याच्या पूर्वी ज्या तिथीस आरंभ होतो ती तिथि त्या दिवसाची असें समजतात. आणि ज्या तिथीचा आरंभ सूर्योदयानंतर होतो व त्याच दिवशीं तिची समाप्ति होते, ती तिथि दुसऱ्या दिवसाची असें समजून तिचा क्षय करितात.

विक्रमसंवत्–शालिवाहनाच्या पूर्वी सुमारें १३५ वर्षें उज्जनी येथें विक्रमादित्य नांवाचा राजा राज्य करीत होता, व त्यापासून विक्रमसंवत् चालू झाला. हा संवत् उत्तर-हिंदुस्थानांत व तेलंगणांत चालू आहे. तसेच नर्मदेच्या दक्षिणेस गुजराथेंतही चालू आहे. परंतु काशी, उज्जनी व नर्मदेच्या उत्तरेकडील प्रांतांत वद्यप्रतिपदेस वर्षाचा आरंभ होतो असें धरतात. व नर्मदेच्या दक्षिणेस व हिंदुस्थानच्या पश्चिमेकडे शुद्ध प्रतिपदेपासून धरितात. पहिल्या पद्धतीस शुक्लदी आणि दुसरीस कृष्णादी म्हणतात. नर्मदेच्या उत्तरेस व दक्षिणेस दोहीं-कडे चैत्रशुद्ध प्रतिपदेसच वर्षाचा आरंभ होतो; परंतु काशीकडे नेहमीं शुद्धपक्षापूर्वी कृष्णपक्षास शुद्धपक्ष असें म्हणून पूर्वीच्या वर्षाच्या शेवटल्या चांद्रमासाच्या अर्धापासूनच चैत्रास आरंभ होतो, असें समजतात. काशी, उज्जनी वगैरे ठिकाणीं विक्रमसंवताचा आरंभ चैत्रांत होतो. परंतु नर्मदेच्या दक्षिणेस आणि हिंदुस्थानच्या पश्चिमभागी विक्रमसंवतास कार्तिकशुद्ध प्रतिपदेस आरंभ होतो. गुजराथेंत या संवताची प्रवृत्ति असून कार्तिकशुद्ध प्रतिपदेस नवीन संवतास आरंभ होतो व त्याचप्रमाणें जंत्रीत दिला आहे. परंतु पुढील पक्षास मार्गशीर्ष वद्य, पुढें मार्गशीर्षशुद्ध, पुढें पौष वद्य व त्यापुढें पौषशुद्ध या रीतीनें गणण्याचा त्यांचा परिपाठ आहे, व सालअखेरीस कार्तिक वद्य येतो!

विक्रमसंवताचे व शालिवाहनशकाचे महिने व तिथि एकच असतात. विक्रमसंवतांत १३५ वजा केले म्हणजे शालिवाहन आणि ५७ वजा केलें म्हणजे इसवी सन येतात.

राज्यशक किंवा राज्याभिषेकशक—मराठी राज्याचे स्थापक शिवाजी महाराज यांनीं शके १५९६ आनंदनामसंवत्सर ज्येष्ठ शुद्ध १३ गुरुवारीं ( इसवी सन १६७४ तारीख ६ जून ) आपणास राज्याभिषेक करवून त्या दिवसापासून त्यांनीं आपला राज्याभिषेक शक चालू केला. राज्याभिषेक शकावरून इसवीसन काढणें झाल्यास त्यांत १६७४ मिळविले पाहिजेत. या शकाचे संवत्सर व मास शालिवाहन शकाप्रमाणेंच असतात.

हिजरीसन—हिजरीसन सर्व मुसलमानी देशांत चालू आहे. महंमदपैगंबर मक्केहून मदिनेस पळून गेला त्या वेळेपासून या सनास आरंभ झाला. ही गोष्ट तारीख १६ जुलई

इसवी सन ६२२ सालीं घडली. व या तारखेसच हिजरीसनास आरंभ झाला. हिजरीसनाचे साल चांद्रमानाचें असतें आणि ३० वर्षांच्या कालचक्रांत १९ वर्षांचे ३५४ प्रमाणें दिवस असतात, आणि ११ वर्षांचे ३५५ प्रमाणें असतात, व यांस अधिक वर्षे असें समजतात. या ३० वर्षांचे मिळून १०६३१ दिवस होतात. ह्मणून हीं ३० सालें जूलियन पद्धतीचीं २९ वर्षे व ३९ दिवस यांबरोबर असतात. प्रत्येक वर्षाचे १२ महिने असतात. आणि प्रत्येक महिन्याचे दिवस अनुक्रमें ३० आणि २९ असे असतात. आणि ह्मणून पहिल्या ( मोहरम ) महिन्याचे ३० आणि शेवटल्या ( जिल्हेज ) महिन्याचे २९ दिवस असतात; परंतु अधिक वर्षाच्या जिल्हेज महिन्याचे नेहमीं ३० दिवस धरितात. ३० वर्षांच्या कालचक्रांत २ रें, ५ वें ७ वें, १० वें, १३ वें, १६ वें, १८ वें, २१ वें, २४ वें, २६ वें आणि २९ वें वर्ष यांस अधिक वर्षे समजून यांतील जिल्हेज महिन्याचे ३० दिवस धरितात. दक्षणेंतील मुसलमानी राजे याच सनाप्रमाणें कालगणना करीत होते. व त्यांच्या सनदापत्रांत हाच सन असतो. अगदीं अलीकडे सूरसन व फसली सन आढळतात.

आर्बी किंवा सूरसन—या सनाचा आरंभ हिजरीसनाच्या पूर्वी २२ वर्षे ह्मणजे इ० स० ६०० तारीख २४ मे रोजीं झाला. महमद तघलखाच्या कारकीर्दीत दक्षणेंत मुसलमानी स्वतंत्र राज्य स्थापन झाल्यावर हा सन दक्षणेंत सुरू झाला असावा असें दिसतें. सुरू सनावरून इसवी सन काढणें झाल्यास मृगापूर्वी त्यांत ६०० वर्षे मिळवून आणि मृगानंतर ५९९ वर्षे मिळवून काढावा. या सनाचीं वर्षे (आर्बी) अंकाच्या नांवाच्या अक्षरांनीं लिहिण्याची वहिवाट आहे. प्रस्तुत जंत्रींत सनाचा आंकडा देऊन सन अक्षरांनींही लिहिला आहे. कागदपत्रांत फक्त अक्षरीं सनच लिहिण्याची वहिवाट आहे. त्याची मोड समजण्याकरितां खालीं आर्बी आंकडे व त्यांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांवरून लक्षांत येईल. मराठेशाईंतील कागदपत्रांत हा सन फार आढळतो. याचे महिने व तारखा हिजरीसनाप्रमाणें असतात.

| | | |
|---|---|---|
| १ इहिदे. | ११ इहिदे अशर. | १२२ इसन्ने अशरीनमय्या. |
| २ इसन्ने. | २० अशरीन. | २०० मय्यातैन. |
| ३ सल्लास. | ३० सल्लासीन. | ३०० सल्लासमय्या. |
| ४ आर्बा. | ४० आर्बैन. | ४५० खमसैन आर्बामय्या. |
| ५ खमस. | ५० खमसैन. | १००० अल्लफ. |
| ६ शीत. | ६० शितैन. | ११०० मय्या व अल्लफ. |
| ७ सब्बा. | ७० सब्बैन. | १२३० सल्लासीन मयातैन व अल्लफ. |
| ८ सम्मान. | ८० सम्मानीन. | १३१३ सल्लास अशर सल्लास मय्या व अल्लफ. |
| ९ तिस्सा. | ९० तिसैन. | १४१५ खंमस अशर आर्बा मय्या व अल्लफ. |
| १० अशर. | १०० मय्या. | १५०० खंमस मय्या व अल्लफ. |

फसली सन—फसलीसनासही मृगासच आरंभ होतो. शहाजहान बादशानें दक्षणेंतील कांहीं मुसलमानी राजास जिंकून तोडरमल्लाच्या जमाबंदीची शिस्त सुरू केली, तेव्हां त्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत अकबरानें सुरू केलेलें फसली सालही दक्षिणेंत आलें, व पुढें

मराठ्यांनीं दक्षिणेंत अम्मल स्थापन केल्यावर आपल्या कागदोपत्रींही याच सालाचा फार उपयोग करूं लागले. एतद्देशीय संस्थानिक अद्यापही फसली सालाप्रमाणेंच हिशेब वगैरे करितात. हें साल सुरसनाहून ९ वर्षांनीं पुढें असतें. फसलीसालांत मृगापूर्वी ५९१ व मृगानंतर ५९० वर्षें मिळविलीं ह्मणजे इसवी सन निघतो. सुरसन व फसली सन या दोहोंचेही मुसलमानी महिने व तारखा हिजरीसनाप्रमाणेंच असतात.

इसवीसन—प्राचीनकाळीं युरोपांत वर्षाचे सरसकट ३६५ दिवस धरून कालगणना करीत. परंतु सूर्याभोंवतीं पृथ्वीची प्रदक्षिणा पुरी होण्यास याहून ५।६ तास जास्त लागतात. म्हणून पंचांगांतील सण, वार, संक्रांती वगैरे प्रत्यक्ष गोष्टींस मिळेनात, आणि गोंधळ होऊं लागला. तेव्हां जूलिअस सीझर यानें अलेक्झांड्रियाचा प्रसिद्ध जोतिषी सोसिजिनीस यास बोलावून उभयतांनीं गणित करून पंचांगांत सुमारें ८० दिवसांची चूक झाली आहे असें काढिलें. आणि त्या सालांत तितके दिवस मिळवून तें साल ४४५ दिवसांचें धरिलें. पुढें वर्षाचे ३६५ दिवस ६ तास सरासरीनें धरून दरसाल जी ६ तासांची कसर जाते ती भरून काढण्यासाठीं दर चवथ्या सालीं फेब्रुवारीचे २९ दिवस धरावे असें ठरविलें. ही सुधारणा खिस्तीशकाच्या पूर्वी ४४ वे वर्षी अमलांत आली.

येशूखिस्तापासून इसवीसन चालू झाला. येशूचा जन्म तारीख २५ डिसेंबर रोजीं झाला, तरी रोमन लोकांच्या वर्षास तारीख १ जानेवारीस आरंभ होत होता. म्हणून या सनाचाही आरंभ त्याच तारखेस करून जूलिअनपद्धतीप्रमाणें गणना करूं लागले, व हीच पद्धत शेंकडो वर्षे युरोपांत चालू होती; परंतु सर्याभोंवती पृथ्वीची प्रदक्षिणा ३६५ दिवस ५ तास ४८ मिनिटें ४८ सेकंद इतक्या कालांत होते; असें जोतिषांनीं पुढें ठरविलें. म्हणून जूलियन पद्धतीप्रमाणें प्रत्येक ४ थें वर्ष ११ मिनिटें १२ सेकंद एवढ्या काळानें वाढत गेल्यामुळें कित्येक वर्षांनी बरीच चूक झाली. ह्मणून वर्षाचा आरंभ आणि *क्रांतिसंपात यामधील काळ नेहमीं सारखा ठेवण्याकरितां दर चवथें वर्ष ५ दिवसानें वाढवावयाचें, असें जें जूलियनपद्धतीप्रमाणें चाललें होतें त्यानें चूक हात जाऊन पंचांगातील क्रांतिसंपातकाळ आणि प्रत्यक्ष क्रांतिसंपानी सूर्याचें येणें यामध्यें मेळ बसेना. जूलियन पद्धतीच्या दर ४ थ्या वर्षी ह्मणजे लीपवर्षी साल ११ मिनिटें १२ सेकंदानीं जास्त धरीत गेल्यानें सुमारें १२९ लीपवर्षांनीं एक दिवसाची वाढ झाली. $\left(\frac{६७२}{३६००} \times \frac{१२९}{१} \times \frac{१}{२४} = \frac{९०३}{९००} = १\frac{१}{३००}\right)$ या प्रमाणें कांहीं शतकें गेल्यावर पंचांगांतील क्रांतिसंपात मागें मागें जाऊं लागला. जेव्हां जूलियनपद्धत सुरू झाली तेव्हां महाविषुव किंवा वसंतऋतूंतील क्रांतिसंपात तारीख २५ मार्च रोजीं पडला होता. तोच पुढें इसवी सन ३२५ या सालीं नैसच्या कौन्सिलच्या वेळीं २१ मार्च रोजीं पडला, व या वेळीं हीच तारीख क्रांतिसंपाताची धरावी असें ठरलें. पुढें इसवी सन १५८२ सालीं १३ वा

* जेव्हां सूर्य थेट विषुववृत्तावर येतो, किंवा क्रांतिवृत्त विषुववृत्तास ज्या ठिकाणीं छेदितें त्या ठिकाणावर थेट सूर्य आला ह्मणजे त्यास क्रांतिसंपात ह्मणतात.

पोपग्रेगरी यानें खिस्तीपंचांगांत सुधारणा केली तेव्हां हा क्रांतिसंपात ता० ११ मार्च रोजीं ह्मणजे आणखीं १० दिवस मागें गेला होता. याकरितां क्रांतिसंपाताचा काळ प्रत्यक्ष संपाताशीं जुळविण्याकरितां १३ वा पोपग्रेगरी यानें पंचांगांत पुनः सुधारणा केली, आणि सर्व युरोपांत असें जाहीर केलें कीं, ही १० दिवसांची वाढलेली कसर काढण्याकरितां त्या सालच्या ४ थ्या आक्टोबरानंतर ५ व्या आक्टोबरास १५ आक्टोबर ह्मणावें आणि दर चार वर्षांत जी कसर वाढते ती न वाढूं देण्याकरितां दर ४०० वर्षांत ३ सालें लीप धरूं नये ह्मणजे ज्या शेंकड्याच्या सालास ४०० नीं भाग तुटत नाहीं तीं सालें लीपवर्षें धरूं नये. ह्मणजे त्या सालास जरी ४ नीं भाग तुटतो तरी इतर सालांप्रमाणें दर ४०० वर्षांत या तीन सालांचे २८ दिवस धरावें, असें फर्माविलें. याकरितां ग्रेगोरियन पद्धतीप्रमाणें शेंकड्याच्या सालांशिवाय ज्या सालास ४ नीं बरोबर भाग तुटतो, तीं सालें आणि शेंकड्याच्या सालांत ४०० नीं बरोबर भाग तुटतो तीं शेंकड्याचीं सालें लीप वर्षें समजावयाचीं. उदाहरणार्थ १६०० हें लीप वर्ष आहे, परंतु १७००, १८००, १९०० हीं लीपवर्षें नाहींत. इंग्लंडांत सन १७५२ पर्यंत ही पद्धत चालू न होतां जुनी किंवा जूलियन पद्धतच चालू होती. या सालीं पार्लमेंटसभेंत आक्ट पसार होऊन त्या सालापर्यंत ११ दिवसांची कसर वाढली होती, तेवढे दिवस गाळण्याकरितां त्या सालच्या ३ सप्टेंबरास १४ सप्टेंबर ह्मणावयाचें ठरलें, आणि नवी किंवा ग्रेगोरिअन पद्धत सुरू झाली. हल्लीं रूस देशाशिवाय बाकी सर्व खिस्ती देशांत नवी पद्धत चालू आहे.

अर्वाचीन ज्योतिष्यांच्या गणितावरून सौरवर्ष ३६५ दिवस ५ अवर ४८ मिनिटें ४९'६२ सेकंद किंवा ३६५'२४२२४१ इतक्या दिवसांबरोबर असतें असें ठरलें आहे. ग्रेगोरिअन पद्धतीप्रमाणें ४०० वर्षांत ९७ लीपवर्षें असतात. म्हणून ४०० वर्षांचे दिवस ३६५×४००+९७ = १,४६०९७ दिवस होतात. म्हणून प्रत्येक सालाचे ३६५'२४२५ किंवा ३६५ दिवस ५ अवर ४९ मिनिटें आणि १२ सेकंद असतात. येणेंकरून २२'३८ सेकंदाची कसर उत्पन्न होते. या कसरीमुळें ३८६६ वर्षांनीं एक दिवस चूक पडेल. ही चूक इतक्या दीर्घ काळानें पडणारी आहे कीं, तिजविषयीं कांहीं तजवीज करणें जरूर नाहीं; परंतु हीही चूक दुरुस्त करण्याकरितां ४००० वें व त्याचें गुणक हीं सालें लीपवर्षें धरूं नयेत असें कित्येकांचें मत आहे.

सन १७५२ पर्यंत नव्या वर्षाचा आरंभ २५ मार्च या दिवशीं करीत, म्हणून त्या मागील वर्षीं ता० १ ली जानेवारीपासून २४ मार्चपर्यंत जुनें सालच लिहीत, म्हणूनच या सालापूर्वी १७०७।८ असें साल लिहिण्याची वहिवाट होती. याचा अर्थ असा आहे कीं, मार्चपासून जानेवारीपर्यंत मागील साल म्हणजे १७०७ धरावयाचें आणि जानेवारी पासून मार्चपर्यंत १७०८ धरावयाचें; परंतु १७५२ पासून तारीख १ जानेवारी पासूनच नव्या सालास आरंभ करावयाचा असें ठरलें व हल्लीं जुनी किंवा नवी पद्धत चालू असली तरी सर्व ठिकाणीं नव्या सालास तारीख १ जानेवारी पासूनच आरंभ करितात.

केवळ ऐतिहासिक माहितीकरितां जुनें कागदपत्र पहाणारांसच अशा जंत्रीचा उपयोग होईल असें नसून मुलकी व दिवाणी कामगारांस व वकिलांस तर अशा जंत्रीचा हमेश उपयोग

लागतो. जुने दस्तैवज, जुन्या सनदा वगैरे पहात असतां व जुनें कागदपत्र पाहतांना मला ज्या अडचणी आल्या तशा अडचणी त्यास हमेश येत असतील, व त्या कामीं त्यांस या जंत्रीचा फारच उपयोग होईल. जरी पुस्तक जाड कागदावर छापिलें व पानेंही पुष्कळ झाली तरी सर्वांस घेण्यास सुलभ पडावें म्हणून किंमतही माफक ठेविली आहे. शाळांत मुलांचे जन्मदिवस नोंदावे लागतात, सर्व सरकारी कामगारांस सर्व्हिस बुकांत आपलें जन्मदिवस लिहावे लागतात व त्या ठिकाणीं इंग्रजी सन व तारीख द्यावी लागते त्यांसही या जंत्रीवरून एकदम तारीख, वार व महिना काढितां येईल. दस्तैवजाचा खरेखोटेपणा ठरविण्याकरितां तारीख, मिति व वार यांचा मेळ पहाण्यास उपयोग होईल. असो. याप्रमाणें सर्वांस उपयोगीं पडण्याजोगें हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे तर यास सर्वांकडून आश्रय मिळेल अशी उमेद आहे.

हें एवढें प्रचंड काम तडीस नेण्याच्या कामीं रा० रा० दिनकर वासुदव गोखले कारकून निसबत सरलष्कर यांचें फार सहाय्य झालें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे हें मला येथें सांगितलें पाहिजे

कोल्हापूर तारीख ८
मार्च १८८९ इसवी. } **बा० प्र० मोडक.**

# जंत्रीची प्रस्तावना.

कै० तीर्थरूपांनीं महत्प्रयासानें तीन चार जंत्र्या संपादन करून शालिवाहन, विक्रम, राजशक, आर्बी ( सुरु ) सन, फसली, हिजरी आणि इसवी साल, महिना, तिथि, तारीख व वार दाखविणारी जंत्री शके १६५० पासून शके १८१५ पर्यंत ह्मणजे इ० स० १७२८ ते १८९३ अखेर इ० स० १८८९ त प्रसिद्ध केली. पुढें इ० स० १८९४ ते १९१३ अखेर जंत्री त्यांनीं तयार केली; पण ती पुरवणी छापून काढण्यापूर्वीच इ० स० १९०६ त त्यांचा अकस्मात् अंत झाला ! ती पुरवणी इ० स० १९०८ त छापून प्रसिद्ध केली. इ० स० १९१४ ते १९१८ ची पुरवणी इ० स० १९१४ त छापून प्रसिद्ध केली. इ० स० १९१९ ते १९२८ ची पुरवणी इ० स० १९२१ त प्रसिद्ध केली. व इ० स० १९२९ ते १९४० अखेरची पुरवणी आज प्रसिद्ध होत आहे.

**शास्त्रीय ज्ञान-भांडार.**
**शाहूपुरी, कोल्हापूर नं० ३.**
**२१ जानेवारी १९३०.** } **विश्वनाथ बळवंत मोडक.**

## विशेष स्पष्टीकरण.

सूर्यग्रहण अमावास्येस येतें तें ● भरींव टिंबानें दाखविलें आहे व चंद्रग्रहण पौर्णिमेस येतें तें O पोकळ टिंबानें दाखविलें आहे.

ज्या हिजरी सनाचे जिल्हेजचे ३० दिवस धरिले आहेत त्या सनाचे मागें व पुढें – – घालून खुणांनीं दर्शविले आहेत. जसें, –१३४९–, –१३५२– वगैरे

शालिवान शकांतही अधिक वर्षाचे मागें पुढें – – चिन्हें घातलीं आहेत.

नवें वर्ष आलें तेथें तें जाड टाइपानें दाखविलें आहे.

---

## शुद्धिपत्र.

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७ | ३ | नि. आ. | आ. |
| ९ | ११ | रविलाखर | रवि. र. खर. |
| ११ | ६ | १८८९–१८९० | १९८९–१९९० |
| १२ | ३ | नि. वै. | वै. |
| १२ | ११ | जिल्ह | जिल्हे. |
| १२ | १४ फेब्रुवारी | ०/१ | ३०/१ ● |
| १५ | २१ आक्टोबर | ० | १० |
| १८ | १५ मे | ५/३ | ५/६ |

# शक व सन
## यांची
# तिथी व तारीखवार जंत्री.



जन्म. १८४७ ] प्रो० बाळाजी प्रभाकर मोडक. [ मृत्यु १९०६

शालिवाहन, विक्रम, राजशक, सुरूसन, फसली, हिजरी,
आणि इसवी सन, महिना, तिथी,
तारीख व वार दाखविणारी

१९२९ ते १९४०

# सन १९२९ इसवी.

| इंग्रजी म. | जानेवारी | फेब्रुवारी | मार्च | एप्रिल | मे | जून |
|---|---|---|---|---|---|---|
| हिंदु महि. | मार्ग. पौष | पौष माघ | माघ फा. | फा. चैत्र | चैत्र वैशा | वैशा. ज्येष्ठ |
| शालि. श. | १८५० | १८५० | १८५० | १८५१ | १८५१ | १८५१ |
| संवत्सर | विभव | नाम | संवत्सर | शुक्ल | नाम | संवत्सर |
| विक्रम सं. | १९८५ | १९८५ | १९८५ | १९८५ | १९८५ | १९८५ |
| राजशक | २५५ | २५५ | २५५ | २५५ | २५५ | २५६ |
| आर्बी सन | १३२९ | १३२९ | १३२९ | १३२९ | १३२९ | १३३० |
| फसली स. | १३३८ | १३३८ | १३३८ | १३३८ | १३३८ | १३३९ |
| हिजरी स | १३४७ | १३४७ | १३४७ | १३४७ | १३४७ | १३४८ |
| मु महिना | रज्जब साबान | साबान रमजान | रमजान सव्वाल | सव्वा. जिल्काद | जि. जिल्हेज | जिल्हेज मोहरम |

| इंग्रजी तारीख | ति. | वार | मु. | ति. | वार. | मु | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति | वार | मु. | ति. | वार. | मु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ६ | मं | १९ | ७ | गु | २० | ६ | शु | १९ | ७ | सो | २० | ७ | बु | २१ | ९ | श | २२ |
| २ | ७ | बु | २० | ८ | श | २१ | ७ | श | १० | ८ | मं | २१ | ८ | गु | २२ | १० | र | २३ |
| ३ | ८ | गु | २१ | ९ | र | २२ | ८ | र | २१ | ९ | बु | २२ | ९ | शु | २३ | ११ | सो | २४ |
| ४ | ९ | शु | २२ | १० | सो | २३ | ८ | सो | २२ | १० | गु | २३ | १० | श | २४ | १२ | म | २५ |
| ५ | १० | श | २३ | ११ | मं | २४ | ९ | मं | २३ | ११ | शु | २४ | ११ | र | २५ | १३ | बु | २६ |
| ६ | ११ | र | २४ | १२ | बु | २५ | १० | बु | २४ | १२ | श | २५ | १२ | सो | २६ | १४ | गु | २७ |
| ७ | १२ | सो | २५ | १३ | गु | २६ | ११ | गु | २५ | १३ | र | २६ | १३ | मं | २७ | ३० | शु | २८ |
| ८ | १३ | म | २६ | १४ | शु | २७ | १२ | शु | २६ | १४ | सो | २७ | १४ | बु | २८ | १ | श | २९ |
| ९ | १४ | बु | २७ | ३० | श | २८ | १३ | श | २७ | ३० | मं | २८ | ● | गु | २९ | २ | र | १ |
| १० | ३० | गु | २८ | १ | र | २९ | १४ | र | २८ | १ | बु | २९ | १ | शु | ३० | ३ | सो | २ |
| ११ | ३० | शु | २९ | २ | सो | १ | ३० | सो | २९ | २ | गु | १ | २/३ | श | १ | ४ | मं | ३ |
| १२ | १ | श | ३० | ३ | मं | २ | १ | मं | ३० | ३ | शु | २ | ४ | र | २ | ५/६ | बु | ४ |
| १३ | २ | र | १ | ४ | बु | ३ | २ | बु | १ | ४ | श | ३ | ५ | सो | ३ | ७ | गु | ५ |
| १४ | ३ | सो | २ | ५ | गु | ४ | ३ | गु | २ | ५ | र | ४ | ६ | मं | ४ | ८ | शु | ६ |
| १५ | ४ | मं | ३ | ६ | शु | ५ | ४ | शु | ३ | ६ | सो | ५ | ७ | बु | ५ | ९ | श | ७ |
| १६ | ५ | बु | ४ | ७ | श | ६ | ५/६ | श | ४ | ७ | मं | ६ | ८ | गु | ६ | १० | र | ८ |
| १७ | ६/७ | गु | ५ | ८ | र | ७ | ७ | र | ५ | ८ | बु | ७ | ९ | शु | ७ | ११ | सो | ९ |
| १८ | ८ | शु | ६ | ९ | सो | ८ | ८ | सो | ६ | ९/१० | गु | ८ | १० | श | ८ | १२ | मं | १० |
| १९ | ९ | श | ७ | १० | मं | ९ | ९ | मं | ७ | ११ | शु | ९ | ११ | र | ९ | १३ | बु | ११ |
| २० | १० | र | ८ | ११/१२ | बु | १० | १० | बु | ८ | १२ | श | १० | १२ | सो | १० | १४ | गु | १२ |
| २१ | ११ | सो | ९ | १३ | गु | ११ | ११ | गु | ९ | १३ | र | ११ | १३ | मं | ११ | १४ | शु | १३ |
| २२ | १२ | मं | १० | १४ | शु | १२ | १२ | शु | १० | १४ | सो | १२ | १४ | बु | १२ | १५ | श | १४ |
| २३ | १३ | बु | ११ | १५ | श | १३ | १३ | श | ११ | १५ | मं | १३ | ○ | गु | १३ | १ | र | १५ |
| २४ | १४ | गु | १२ | १ | र | १४ | १४ | र | १२ | १ | बु | १४ | १ | शु | १४ | २ | सो | १६ |
| २५ | १५ | शु | १३ | २ | सो | १५ | १५ | सो | १३ | २ | गु | १५ | २ | श | १५ | ३ | मं | १७ |
| २६ | १ | श | १४ | ३ | मं | १६ | १ | म | १४ | २ | शु | १६ | ३ | र | १६ | ४ | बु | १८ |
| २७ | २ | र | १५ | ४ | बु | १७ | २ | बु | १५ | ३ | श | १७ | ४ | सो | १७ | ५ | गु | १९ |
| २८ | ३ | सो | १६ | ५ | गु | १८ | ३ | गु | १६ | ४ | र | १८ | ५ | मं | १८ | ६ | शु | २० |
| २९ | ४ | मं | १७ | | | | ४ | शु | १७ | ५ | सो | १९ | ६ | बु | १९ | ७ | श | २१ |
| ३० | ५ | बु | १८ | | | | ५ | श | १८ | ६ | मं | २० | ७ | गु | २० | ८ | र | २२ |
| ३१ | ६ | शु | १९ | | | | ६ | र | १९ | | | | ८ | शु | २१ | | | |

# सन १९२९ इसवी.

| इंग्रजी म. | जुलै | | | आगष्ट | | | सप्टेंबर | | | आक्टोबर | | | नवंबर | | | डिसेंबर. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| हिंदु महि | ज्येष्ठ.आषा. | | | आषा. श्राव. | | | श्राव. भाद्र. | | | भाद्र. आश्वि | | | आश्व कार्ति | | | कार्ति. मार्ग | | |
| शाले. श. | १८५१ | | | १८५१ | | | १८५१ | | | १८५१ | | | १८५१ | | | १८५१ | | |
| संवत्सर | शुक्र | | | नाम | | | | | | संवत्सर | | | | | | | | |
| विक्रम सं | १९८५ | | | १९८५ | | | १९८५ | | | १९८५ | | | १९८६ | | | १९८६ | | |
| राजशक | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५६ | | |
| आर्बी स. | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३० | | |
| फसली स. | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | |
| हिजरी स. | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | |
| मु महिना | मोहं सफर. | | | स. र. वल. | | | र.वल.र खर | | | र.खर. ज.व. | | | जवल.ज ख. | | | जाखर.रज्ज. | | |
| इंग्रजी तारीख. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार | मु. | ति. | वार | मु | ति | वार. | मु. | ति. | वार. | मु |
| १ | ९ | सो | २३ | ११ | गु | २४ | १३ | र | २६ | १४ | म | २६ | [illegible] | शु | २८ | ३० | र | २८ |
| २ | १० | मं | २४ | १२ | शु | २५ | १४ | सो | २७ | ३० | बु | २७ | १ | श | २९ | १ | सो | २९ |
| ३ | ११ | बु | २५ | १३ | श | २६ | ३० | मं | २८ | १ | गु | २८ | २ | र | ३० | २ | मं | १ |
| ४ | १२ | गु | २६ | १४ | र | २७ | १ | बु | २९ | २ | शु | २९ | ३ | सो | १ | ३ | बु | २ |
| ५ | १३/१४ | शु | २७ | ३० | सो | २८ | २ | गु | ३० | ३ | श | १ | ४ | मं | २ | ४ | गु | ३ |
| ६ | ३० | श | २८ | १/२ | मं | २९ | ३ | शु | १ | ४ | र | २ | ५ | बु | ३ | ५ | शु | ४ |
| ७ | १ | र | २९ | ३ | बु | १ | ४ | श | २ | ५ | सो | ३ | ६ | गु | ४ | ६ | श | ५ |
| ८ | २ | सो | ३० | ४ | गु | २ | ५ | र | ३ | ५ | मं | ४ | ७ | शु | ५ | ७ | र | ६ |
| ९ | ३ | मं | १ | ५ | शु | ३ | ६ | सो | ४ | ६ | बु | ५ | ८ | श | ६ | ८ | सो | ७ |
| १० | ४ | बु | २ | ६ | श | ४ | ७ | मं | ५ | ७ | गु | ६ | ८ | र | ७ | ९ | मं | ८ |
| ११ | ५ | गु | ३ | ७ | र | ५ | ८ | बु | ६ | ८ | शु | ७ | ९ | सो | ८ | १० | बु | ९ |
| १२ | ६ | शु | ४ | ८ | सो | ६ | ९ | गु | ७ | ९ | श | ८ | १० | मं | ९ | ११ | गु | १० |
| १३ | ७ | श | ५ | ९ | मं | ७ | १० | शु | ८ | १० | र | ९ | ११ | बु | १० | १२ | शु | ११ |
| १४ | ८ | र | ६ | १० | बु | ८ | ११ | श | ९ | ११ | सो | १० | १२ | गु | ११ | १३ | श | १२ |
| १५ | ९ | सो | ७ | १० | गु | ९ | १२ | र | १० | १२ | मं | ११ | १३ | शु | १२ | १४ | र | १३ |
| १६ | १० | मं | ८ | ११ | शु | १० | १३ | सो | ११ | १३ | बु | १२ | १४/१५ | श | १३ | १५ | सो | १४ |
| १७ | ११ | बु | ९ | १२ | श | ११ | १४ | मं | १२ | १४ | गु | १३ | १ | र | १४ | १ | मं | १५ |
| १८ | १२ | गु | १० | १३ | र | १२ | १५ | बु | १३ | १५ | शु | १४ | २ | सो | १५ | २ | बु | १६ |
| १९ | १३ | शु | ११ | १४ | सो | १३ | १ | गु | १४ | १ | श | १५ | ३ | मं | १६ | ३ | गु | १७ |
| २० | १४ | श | १२ | १५ | मं | १४ | २ | शु | १५ | २ | र | १६ | ४ | बु | १७ | ४/५ | शु | १८ |
| २१ | १५ | र | १३ | १ | बु | १५ | ३ | श | १६ | ३ | सो | १७ | ५ | गु | १८ | ६ | श | १९ |
| २२ | १ | सो | १४ | २ | गु | १६ | ४ | र | १७ | ४ | मं | १८ | ६ | शु | १९ | ७ | र | २० |
| २३ | २ | मं | १५ | ३ | शु | १७ | ५ | सो | १८ | ५ | बु | १९ | ७ | श | २० | ८ | सो | २१ |
| २४ | ३ | बु | १६ | ४ | श | १८ | ६ | मं | १९ | ६/७ | गु | २० | ८ | र | २१ | ९ | मं | २२ |
| २५ | ४ | गु | १७ | ५ | र | १९ | ७ | बु | २० | ८ | शु | २१ | ९ | सो | २२ | १० | बु | २३ |
| २६ | ५ | शु | ८ | ६ | सो | २० | ८ | गु | २१ | ९ | श | २२ | १० | मं | २३ | ११ | गु | २४ |
| २७ | ६ | श | १९ | ७ | मं | २१ | ९ | शु | २२ | १० | र | २३ | ११ | बु | २४ | १२ | शु | २५ |
| २८ | ७ | र | २० | ८ | बु | २२ | १० | श | २३ | ११ | सो | २४ | १२ | गु | २५ | १३ | श | २६ |
| २९ | ८ | सो | २१ | ९/१० | गु | २३ | ११ | र | २४ | १२ | मं | २५ | १३ | शु | २६ | १४ | र | २७ |
| ३० | ९ | मं | २२ | ११ | शु | २४ | १२/१३ | सो | २५ | १३ | बु | २६ | १४ | श | २७ | ३० | सो | २८ |
| ३१ | १० | बु | २३ | १३ | श | २५ | | | | १४ | गु | २७ | | | | अ | मं | २९ |

# सन १९३० इसवी.

| इंग्रजी म. | जानेवारी | | | फेब्रुवारी | | | मार्च | | | एप्रिल | | | मे | | | जून | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| हिंदु महि. | पौष. माघ | | | माघ | | | फा. चैत्र | | | चैत्र वशा. | | | वैशा. ज्येष्ठ | | | ज्येष्ठ. आषा. | | |
| शालि. श | १८५१ | | | १८५१ | | | १८५२ | | | १८५२ | | | १८५२ | | | १८५२ | | |
| संवत्सर | शुक्ल | | | नाम | | | संवत्सर | | | प्रमोद | | | नाम | | | संवत्सर | | |
| विक्रम सं. | १९८६ | | | १९८६ | | | १९८६ | | | १९८६ | | | १९८६ | | | १९८६ | | |
| राजशक | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५६ | | | २५७ | | |
| आर्बी सन | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३० | | | १३३१ | | |
| फसली स | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३३९ | | | १३४० | | |
| हिजरी स | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | | १३४८ | | | १३५० | | | १३४९ | | |
| मु महिना | साबा रम | | | रमजान | | | सव्वा जि. | | | जि. जि. हेज | | | जिल्हे मोह | | | मोह. सफ. | | |
| इंग्रजी तारीख | ति. | वार | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. |
| १ | १ | बु | ३० | ३ | श | २ | १ | श | ३० | २ | मं | २ | ३ | गु | २ | ५ | र | ४ |
| २ | २ | गु | १ | ४ | र | ३ | २ | र | १ | ३ | बु | ३ | ४ | शु | ३ | ६ | सो | ५ |
| ३ | ३ | शु | २ | ४ | सो | ४ | ३ | सो | २ | ४ | गु | ४ | ५ | श | ४ | ७ | मं | ६ |
| ४ | ४ | श | ३ | ५ | मं | ५ | ४ | मं | ३ | ५ | शु | ५ | ६ | र | ५ | ८ | बु | ७ |
| ५ | ५ | र | ४ | ६/७ | बु | ६ | ५ | बु | ४ | ६/७ | श | ६ | ७ | सो | ६ | ९ | गु | ८ |
| ६ | ६ | सो | ५ | ८ | गु | ७ | ६ | गु | ५ | ८ | र | ७ | ८ | मं | ७ | १० | शु | ९ |
| ७ | ७ | मं | ६ | ९ | शु | ८ | ७ | शु | ६ | ९ | सो | ८ | १० | बु | ८ | ११ | श | १० |
| ८ | ८ | बु | ७ | १० | श | ९ | ८ | श | ७ | १० | मं | ९ | ११ | गु | ९ | १२ | र | ११ |
| ९ | ९ | गु | ८ | ११ | र | १० | ९ | र | ८ | ११ | बु | १० | १२ | शु | १० | १३ | सो | १२ |
| १० | १० | शु | ९ | १२ | सो | ११ | १० | स | ९ | १२ | गु | ११ | १३ | श | ११ | १४ | मं | १३ |
| ११ | ११ | श | १० | १३ | मं | १२ | ११ | मं | १० | १३ | शु | १२ | १४ | र | १२ | १५ | बु | १४ |
| १२ | १२ | र | ११ | १४ | बु | १३ | १२/१३ | बु | ११ | १४ | श | १३ | १५ | सो | १३ | १ | गु | १५ |
| १३ | १३ | सो | १२ | १५ | गु | १४ | १४ | गु | १२ | O | र | १४ | १ | मं | १४ | २ | शु | १६ |
| १४ | १४/१५ | मं | १३ | १ | गु | १५ | १५ | शु | १३ | १ | सो | १५ | २ | बु | १५ | ३ | श | १७ |
| १५ | १ | बु | १४ | २ | श | १६ | १ | श | १४ | २ | मं | १६ | ३ | गु | १६ | ४ | र | १८ |
| १६ | २ | गु | १५ | ३ | र | १७ | २ | र | १५ | ३ | बु | १७ | ४ | शु | १७ | ५ | सो | १९ |
| १७ | ३ | शु | १६ | ४ | सो | १८ | ३ | सो | १६ | ४ | गु | १८ | ५ | श | १८ | ६ | मं | २० |
| १८ | ४ | श | १७ | ५/६ | मं | १९ | ४ | मं | १७ | ५ | शु | १९ | ६ | र | १९ | ७ | बु | २१ |
| १९ | ५ | र | १८ | ७ | बु | २० | ५ | बु | १८ | ६ | श | २० | ६ | सो | २० | ८ | गु | २२ |
| २० | ६ | सो | १९ | ७ | गु | २१ | ६ | गु | १९ | ७ | र | २१ | ७ | मं | २१ | ९ | शु | २३ |
| २१ | ७ | मं | २० | ८ | शु | २२ | ७ | शु | २० | ८ | सो | २२ | ८ | बु | २२ | १० | श | २४ |
| २२ | ८ | बु | २१ | ९ | श | २३ | ८ | श | २१ | ९ | मं | २३ | ९ | गु | २३ | ११ | र | २५ |
| २३ | ९ | गु | २२ | १० | र | २४ | ९ | र | २२ | १० | बु | २४ | १० | शु | २४ | १२ | सो | २६ |
| २४ | १० | शु | २३ | ११ | सा | २५ | १० | सो | २३ | ११ | गु | २५ | ११ | श | २५ | १३ | मं | २७ |
| २५ | ११ | श | २४ | १२ | मं | २६ | ११ | मं | २४ | १२ | शु | २६ | १२ | र | २६ | १४ | बु | २८ |
| २६ | १२ | र | २५ | १३ | बु | २७ | ११ | बु | २५ | १३ | श | २७ | १३ | सो | २७ | ३० | गु | २९ |
| २७ | १३ | सो | २६ | १४ | गु | २८ | १२ | गु | २६ | १४ | र | २८ | १४ | मं | २८ | १ | शु | ३० |
| २८ | १४ | मं | २७ | ३० | शु | २९ | १३ | शु | २७ | ३० | सो | २९ | ३० | बु | २९ | २ | श | १ |
| २९ | ३० | बु | २८ | | | | १४ | श | २८ | १ | मं | ३० | १ | गु | १ | ३ | र | २ |
| ३० | १ | गु | २९ | | | | ३० | र | २९ | २ | बु | १ | २/३ | शु | २ | ४ | सो | ३ |
| ३१ | २ | शु | १ | | | | १ | सो | १ | | | | ४ | श | ३ | | | |

| इंग्रजी म. | जुलै | आगष्ट | सप्टेंबर | आक्टोबर | नवंबर | डिसेंबर |
|---|---|---|---|---|---|---|
| हिंदु महि | आषा. श्राव. | श्राव. भाद्र. | भाद्र. आश्वि. | आश्वि कार्ति | कार्ति. मार्ग. | मार्ग. पौष. |
| शालि. श. | १८५२ | १८५२ | १८५२ | १८५२ | १८५२ | १८५२ |
| संवत्सर | प्रमोद | नाम | | संवत्सर | | |
| विक्रम सं. | १९८६ | १९८६ | १९८६ | १९८७ | १९८७ | १९८७ |
| राजशक | २५७ | २५७ | २५७ | २५७ | २५७ | २५७ |
| आर्बी स. | १३३१ | १३३१ | १३३१ | १३३१ | १३३१ | १३३१ |
| फसलीस. | १३४० | १३४० | १३४० | १३४० | १३४० | १३४० |
| हिजरी स. | –१३४९– | –१३४९– | –१३४९– | –१३४९– | –१३४९– | –१३४९– |
| मु. महिना | सफर. र.व. | र.वल. र.खर | र.खर. ज.व. | ज.व. ज.ख. | ज.ख. रज्ज. | रज्ज. साबा |

| इंग्रजी तारीख. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. | ति. | वार. | मु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | —५/६ | मं | ४ | ७ | शु | ६ | ९ | सो | ७ | ९ | बु | ८ | १० | श | ९ | ११ | सो | १० |
| २ | ७ | बु | ५ | ८ | श | ७ | १० | मं | ८ | १० | गु | ९ | ११ | र | १० | १२ | मं | ११ |
| ३ | ८ | गु | ६ | ९ | र | ८ | ११ | बु | ९ | ११ | शु | १० | १२ | सो | ११ | १२ | बु | १२ |
| ४ | ९ | शु | ७ | १० | सो | ९ | १२ | गु | १० | १२ | श | ११ | १३ | मं | १२ | १३ | गु | १३ |
| ५ | १० | श | ८ | ११ | मं | १० | १३ | शु | ११ | १३ | र | १२ | १४ | बु | १३ | —१४/१५ | शु | १४ |
| ६ | ११ | र | ९ | १२ | बु | ११ | १४ | श | १२ | १४ | सो | १३ | १५ | गु | १४ | १ | श | १५ |
| ७ | १२ | सो | १० | १३ | गु | १२ | १४ | र | १३ | ○ | मं | १४ | १ | शु | १५ | २ | र | १६ |
| ८ | १३ | मं | ११ | १४ | शु | १३ | १५ | सो | १४ | १ | बु | १५ | २ | श | १६ | ३ | सो | १७ |
| ९ | १४ | बु | १२ | १५ | श | १४ | १ | मं | १५ | २ | गु | १६ | ३ | र | १७ | ४ | मं | १८ |
| १० | १५ | गु | १३ | १ | र | १५ | २ | बु | १६ | ३ | शु | १७ | ४ | सो | १८ | ५ | बु | १९ |
| ११ | १ | शु | १४ | २ | सो | १६ | ३ | गु | १७ | ४ | श | १८ | ५ | मं | १९ | ६ | गु | २० |
| १२ | २ | श | १५ | ३ | मं | १७ | ४ | शु | १८ | ५ | र | १९ | ६ | बु | २० | ७ | शु | २१ |
| १३ | ३ | र | १६ | ४ | बु | १८ | ५ | श | १९ | ६ | सो | २० | ७/८ | गु | २१ | ८ | श | २२ |
| १४ | ३ | सो | १७ | ५ | गु | १९ | ६ | र | २० | ७ | मं | २१ | ९ | शु | २२ | ९ | र | २३ |
| १५ | ४ | मं | १८ | ६ | शु | २० | ७ | सो | २१ | ८ | बु | २२ | १० | श | २३ | १० | सो | २४ |
| १६ | ५ | बु | १९ | ७ | श | २१ | ८ | मं | २२ | ९ | गु | २३ | ११ | र | २४ | ११ | मं | २५ |
| १७ | ६ | गु | २० | ८ | र | २२ | ९/१० | बु | २३ | १० | शु | २४ | १२ | सो | २५ | १२ | बु | २६ |
| १८ | ७ | शु | २१ | ९ | सो | २३ | ११ | गु | २४ | ११ | श | २५ | १३ | मं | २६ | १३ | गु | २७ |
| १९ | ८ | श | २२ | १० | मं | २४ | १२ | शु | २५ | १२ | र | २६ | १४ | बु | २७ | १४/३० | शु | २८ |
| २० | ९ | र | २३ | ११ | बु | २५ | १३ | श | २६ | १३/१४ | सो | २७ | ३० | गु | २८ | ३० | श | २९ |
| २१ | १० | सो | २४ | १२ | गु | २६ | १४ | र | २७ | ३० | म | २८ | १ | शु | २९ | १ | र | ३० |
| २२ | ११ | मं | २५ | १३ | शु | २७ | ३० | सो | २८ | १ | बु | २९ | २ | श | १ | २ | सो | १ |
| २३ | १२ | बु | २६ | १४ | श | २८ | १ | मं | २९ | २ | गु | ३० | ३ | र | २ | ३ | मं | २ |
| २४ | १३/१४ | गु | २७ | ३० | र | २९ | २ | बु | १ | ३ | शु | १ | ४ | सो | ३ | ४ | बु | ३ |
| २५ | ३० | शु | २८ | १/२ | सो | ३० | ३ | गु | २ | ४ | श | २ | ५ | मं | ४ | ५ | गु | ४ |
| २६ | १ | श | २९ | ३ | मं | १ | ४ | शु | ३ | ५ | र | ३ | ६ | बु | ५ | ६ | शु | ५ |
| २७ | २ | र | १ | ४ | बु | २ | ५ | श | ४ | ६ | सो | ४ | ७ | गु | ६ | ७ | श | ६ |
| २८ | ३ | सो | २ | ५ | गु | ३ | ६ | र | ५ | ७ | मं | ५ | ८ | शु | ७ | ८ | र | ७ |
| २९ | ४ | मं | ३ | ६ | शु | ४ | ७ | सो | ६ | ८ | बु | ६ | ९ | श | ८ | ९ | सो | ८ |
| ३० | ५ | बु | ४ | ७ | श | ५ | ८ | मं | ७ | ८ | गु | ७ | १० | र | ९ | १० | मं | ९ |
| ३१ | ६ | गु | ५ | ८ | र | ६ | | | | ९ | शु | ८ | | | | ११ | बु | १० |

